**राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत**
**राज्यातील कृषि पणन क्षेत्रातील**
**आवश्यक पायाभूत सुविधा विकास**
**प्रकल्पांना प्रशासकीय व तांत्रिक**
**मान्यता देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
शासन निर्णय क्रमांक राकृवियो ०८१०/प्र.क्र.१९१/२१-स,
मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक : ०५/०८/२०१०

**वाचा :** १. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे यांचेकडील पत्र जा.क्र.मरा कृपमं/प्रकल्प/ आरकेव्हीवाय/१८६०/२०१०, दि. २३.०६.२०१०.

२ कृषि व पदुम विभागाचे पत्र क्रमांक राकृवि-२०१०/प्र.क्र.५२/राकृवियो कक्ष, दिनांक२/८/२०१०.

**प्रस्तावना :**

देशातील कृषि क्षेत्राचा विकास ११ व्या पंचवार्षिक योजनेदरम्यान किमान ४ % दराने घडवून आणण्याकरिता तसेच कृषि क्षेत्रातील विविध नाविन्यपूर्ण उपक्रमांना चालना देता यावी त्याचप्रमाणे दिर्घकालीन लाभ देणा-या पायाभूत सुविधांचा विकास घडवून आणण्याकरिता केंद्र शासन राज्य शासनामार्फत १००% केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय कृषि विकास योजना राबवित आहे.

पणन विभागातर्फे राज्याच्या कृषि पणन क्षेत्रामधील सध्याच्या तसेच भावी गरजा लक्षात घेवून प्रमुख पायाभूत सुविधा विकासाच्यादृष्टीने अनेक सुविधांची उभारणी केली आहे. राज्यातील पणनविषयक कामास गती देण्याकरिता राज्यातील विविध भागातील प्रमुख कृषि उत्पादनांच्या अनुषंगाने पणनविषयक सुविधांची उभारणी तसेच राज्यातील अपेक्स सोसायटीच्या संलग्न संस्थांचे (महाग्रेप्स, महाअनार, महाऑरेंज) बळकटीकरण होणे आवश्यक आहे. महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळाने खालील प्रकल्पांच्या प्रस्तावांची तांत्रिक व प्रशासकीय छाननी करुन शासनास सादर केले असल्याचे लक्षात घेता शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णयः-**

१. राज्यातील विविध भागांमधील प्रमुख कृषि उत्पादनांच्या अनुषंगाने पणन विभागातर्फे पुढील प्रकल्प राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत अनुदानाकरिता प्रस्तावित करण्यात येत आहेत.

**(रुपये लाखात)**

| अ.क्र. | प्रकल्पाचे नाव | प्रकल्प खर्च | अनुदानाचा प्रस्ताव | प्रकल्पाचे उद्दीष्ट |
|---|---|---|---|---|
| १ | फुले निर्यात सुविधाबाबतचा प्रकल्प. | १,३७६.१८ | १,०३२.१४ | फुलांच्या निर्यातीकरिता पायाभूत सुविधा विकसीत करणे. |
| २ | फळे व भाजीपाल्याकरिता मॉडर्न मार्केटींगच्या सुविधा निर्माण करणे. | ३,१९० | २,३९२.५ | फळे व भाजीपाल्याकरिता पणन विषयक पायाभूत सुविधा |

याव्यतिरिक्त पुढील प्रकल्प राकृवियो अंतर्गत प्रकल्प किंमतीच्या ५०% अनुदान मंजूरीसाठी प्राप्त झालेले आहेत.

- अपेक्स सोसायटीच्या संलग्न संस्थांचे (महाग्रेप्स, महाअनार, महाऑरेंज) प्रकल्पांतर्गत कार्यक्रमास बळकटी आणणे. (प्रकल्प किंमत - ८६७.८५ लाख )

त्याचप्रमाणे पुढील प्रकल्प राकृवियोंतर्गत प्रकल्प किंमतीच्या १००% अनुदानाकरिता प्राप्त झालेला आहे.

- Development of NIPHT into Center of Excellence.
  (प्रकल्प किंमत - १७०७.२३ लाख )

२. अनुक्रमांक १ येथील नमूद सर्व प्रकल्पांना या विभागाची तांत्रिक व प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

३. सदरच्या प्रकल्पांना विभागाची केवळ प्रशासकीय व तांत्रिक मान्यता प्रदान करण्यात येत असून सदर प्रकल्पांना राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या राज्यस्तरिय प्रकल्प मंजूरी समितीची मान्यता मिळणे आवश्यक असून तद्नंतरच या प्रकल्पांची अंमलबजावणी करण्यात येईल.

४. विभागाने अर्थसहाय्याचा उपरोक्त प्रस्ताव मान्य केला असला तरी सदर प्रकल्पांकरिता राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समिती अर्थसहाय्याच्या जो आराखडा मंजूर करेल त्याच धर्तीवर प्रकल्पांची अंमलबजावणी करण्यात येईल.

५. सदरच्या प्रकल्पांच्या अंमलबजावणीसाठी महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे यांची नोडल एजन्सी म्हणून नेमणूक करण्यात येत असून या योजनेच्या अंमलबजावणी विषयक मार्गदर्शक सुचना राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या मान्यतेनंतर निर्गमित करण्यात येतील.

सदर शासन निर्णय शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१००८१८१६१७०९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सही /-

(श्रीकांत चं. आंडगे)

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन,

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग.

**प्रत :**

१ अपर मुख्य सचिव(कृषि), मंत्रालय,मुंबई

२ प्रधान सचिव (सहकार व पणन), मंत्रालय, मुंबई-३२.
३ प्रधान सचिव (नियोजन), मंत्रालय, मुंबई-३२.
४ प्रधान सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई-३२
५ प्रधान सचिव (जलसंधारण), ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६ प्रधान सचिव (पदुम), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७ सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८ आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९ कृषि पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१० कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, गुलटेकडी, मार्केटयार्ड, पुणे.
११ सर्व जिल्हा उप निबंधक, सहकारी संस्था,
१२ निवड नस्ती